**राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत**
**केंद्र शासनाकडून सन २००९-१०**
**मध्ये प्राप्त झालेल्या निधीचे वितरण**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. राकृवि-२००९/प्र.क्र. ९०/राकृवियो,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : १६ एप्रिल, २०१०**

**वाचा :- १) शासन निर्णय क्र. राकृवि-२००९/प्र.क्र.१०२/राकृवियो, दि. २०/०३/२०१०**
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग **शासन निर्णय क्रमांक मकृप-२००९/ प्र.क्र. ७२/२१-स, दिनांक १३/८/२००९ व दिनांक १२/४/२०१०**
३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग **पत्र क्रमांक सपस-१००९/प्र.क्र.१४६/ २४-स, दिनांक १३/४/२०१०**

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने कृषि व संलग्न क्षेत्रांच्या विकास दरात वाढ करण्याकरिता अकराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत राष्ट्रीय कृषि विकास योजना हा कार्यक्रम राबविण्यास सन २००७-०८ पासून सुरुवात केली आहे. या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीतून पायाभूत सुविधांचा विकास करण्याकरिता प्रकल्प राबविले जातात. या प्रकल्पांना मंजुरी देण्याकरिता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांच्या अध्यक्षतेखाली "राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समिती" गठीत करण्यात आली आहे. सदरहू समितीने सहकार व पणन विभागाच्या "सामुहिक कांदा चाळ" या प्रकल्पास मान्यता दिली आहे.

२. या पार्श्वभुमीवर मंत्रिमंडळाच्या दिनांक २२/७/२००९ रोजी बैठकीत "नाशिक विभागातील शेतकऱ्यांना कांद्याचा योग्य भाव मिळावा म्हणून कांदा साठविण्यासाठी कांदा चाळ उभारण्यासाठी एकूण रुपये ४०.०० कोटी इतका निधी ३ वर्षासाठी उपलब्ध करुन देणे" या सहकार व पणन विभागाच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आली. या मान्यतेच्या अनुषंगाने सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने शासन निर्णय क्रमांक मकृप-२००९/प्र.क्र.७२/२१-स, दिनांक १३.०८.२००९ व १२.४.२०१० अन्वये "सामुहिक कांदा चाळ" या योजनेस रुपये ४०.०० कोटी इतका निधी मंजूर करण्यास मान्यता दिली आहे. या संदर्भात सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने या योजनेकरिता सन २००९-१० व २०१०-११ या वर्षाकरिता मंत्रिमंडळाने मान्य केलेली रुपये २०.०० कोटी इतका निधी राष्ट्रीय कृषि विकास योजनेमधून मंजूर करण्याची विनंती केली होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर शासन, **राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समिती**ने मंजूर केलेल्या "सामुहिक कांदा चाळ" या सहकार व पणन विभागाच्या प्रकल्पास मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने रुपये २०.०० कोटी इतका निधी केंद्र शासनाकडून सन २००९-१० मध्ये प्राप्त झलेल्या निधीतून मंजूर करीत आहे. प्रधान सचिव (कृषि) यांनी स्वीय प्रपंजी

लेख्यात जमा करण्यात आलेल्या रक्कमेपैकी रु.२०.०० कोटी इतकी रक्कम धनादेशाद्वारे कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांना अदा करावी.

२. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पांच्या अनुषंगाने सहकार व पणन विभाग व अंमलबजावणी यंत्रणेस खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

अ) या प्रकल्पाची अंमलबजावणी करण्याकरिता आवश्यक ती सविस्तर कार्यप्रणाली/मार्गदर्शक सूचना सहकार व पणन विभागाने विहित करावी.

आ) सदर निधी राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने मंजूर केलेली "सामुहिक कांदा चाळ" ही योजना व केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेसंदर्भात वेळोवेळी विहित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन खर्च करावा.

इ) सहकार व पणन विभागाने व कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांनी सदरहू प्रकल्पाची अंमलबजावणी, सनियंत्रण आणि मुल्यमापन संदर्भात आवश्यक तो समन्वय आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे व कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य छोटया शेतकऱ्यांचा कृषि व्यापार संघ, पुणे यांच्याशी ठेवावा.

ई) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य छोटया शेतकऱ्यांचा कृषि व्यापार संघ, पुणे यांनी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी व त्याच्या विनियोगाबाबतचा योजनानिहाय हिशोब स्वतंत्रपणे विहित केलेल्या लेखा पध्दतीनुसार ठेवावा. तसेच सदरहू लेख्यांचे लेखा परिक्षण महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई यांच्याकडून करुन घ्यावे.

उ) सहकार व पणन विभागाने मंजूर करण्यात आलेला निधी तात्काळ उपयोगात आणावा.

ऊ) सहकार व पणन विभागाने प्रधान सचिव (सहकार व पणन विभाग) यांच्या सहीचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास सादर करावे.

३. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००४१६१८५७०९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(ग. शा. सोनावणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

प्रधान सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव( सहकार व पणन),सहकार , पणन व वस्त्रोद्योग विभाग ,मंत्रालय,मुंबई-३२
आयुक्त ( कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य छोट्या शेतकऱ्यांचा कृषि व्यापार संघ, पुणे
संचालक (प्रक्रिया व व्यापारक्षम शेती), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे

उपसंचालक (राकृवियो), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
महालेखापाल (लेखा परिक्षा) ,महाराष्ट्र १, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
प्रधान सचिव (कृषि),यांचे स्वीय सहायक कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती